जलसंपदा विभागाअधिनस्त क्षेत्रिय कार्यालयातील गट-क व गट-ड संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या आस्थापनाविषयक बाबीसंदर्भात सुधारणा करण्यासाठी समिती गठीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-११२३/प्र.क्र.१६९/आस्था (अतांत्रिक)
१५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ मे, २०२३

वाचा :- जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र.सुमात २०१२/प्र.क्र.३०६/२०१२/आ.अतांत्रिक, दि.२१ मार्च, २०१३

**प्रस्तावना :**

जलसंपदा विभागांतर्गत क्षेत्रिय कार्यालयातील गट-क व गट-ड संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या सेवा विषयक बाबींसंदर्भात जलसंपदा विभाग जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र.सुमात २०१२/ प्र.क्र.३०६/ २०१२/आ.अतांत्रिक, दि.२१ मार्च, २०१३ अन्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करतांना/ कामकाज करतांना काही प्रशासकीय अडचणी निर्माण होत आहेत. सदर प्रशासकीय अडचणी दूर करण्यासाठी शासन निर्णय दि.२१ मार्च, २०१३ नुसार निर्गमित मार्गदर्शक सूचनांमध्ये सुधारणा करणे आवश्यक आहे. सदर सुधारणा करण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

जलसंपदा विभागांतर्गत क्षेत्रिय कार्यालयातील गट-क व गट-ड संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या सेवा विषयक बाबींसंदर्भात जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र.सुमात २०१२/प्र.क्र.३०६/२०१२/आ.अतांत्रिक, दि.२१ मार्च, २०१३ अन्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करतांना/ कामकाज करतांना काही प्रशासकीय अडचणी निर्माण होत आहेत. सदर प्रशासकीय अडचणी दूर करण्यासाठी शिफारस करणेसाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे | - अध्यक्ष |
| २. | सह सचिव (आस्था), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई | - सदस्य |
| ३. | अधीक्षक अभियंता तथा परिमंडळीय अधिकारी, दक्षता पथक, मुंबई परिमंडळ, ठाणे. | - सदस्य |
| ४. | अधीक्षक अभियंता तथा परिमंडळीय अधिकारी, कोयना बांधकाम मंडळ, कोल्हापूर परिमंडळ, कोल्हापूर. | - सदस्य |
| ५. | अधीक्षक अभियंता (दरवाजे) तथा परिमंडळीय अधिकारी, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक. | - सदस्य |
| ६. | अधीक्षक अभियंता तथा परिमंडळीय अधिकारी, दक्षता पथक, छ.संभाजीनगर | - सदस्य |
| ७. | अधीक्षक अभियंता तथा परिमंडळीय अधिकारी, दक्षता पथक, अमरावती. | - सदस्य |
| ८. | अधीक्षक अभियंता तथा परिमंडळीय अधिकारी, दक्षता पथक, नागपूर. | - सदस्य |
| ९. | अधीक्षक अभियंता तथा संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे. | - सदस्य सचिव |

२. **समितीची कार्यकक्षा :**

१) जलसंपदा विभागाअधिनस्त क्षेत्रिय कार्यालयातील गट-क व गट-ड मधील तांत्रिक व अतांत्रिक संवर्गातील महामंडळ कार्यालय/ मुख्य अभियंता कार्यालय/ मंडळ कार्यालय/ विभाग/ उपविभाग/ शाखा/ उप शाखा येथे कार्यरत कर्मचाऱ्यांच्या सेवा/ आस्थापनाविषयक बाबी (उदा. नियुक्ती प्राधिकारी, पदोन्नती, बिंदूनामावली, बदली, समावेशन, अनुकंपा नियुक्ती या व इतर अनुषंगिक बाबी) हाताळण्यासाठी व प्रशासकीय कामकाज गतिमान सुलभ होण्यासाठी कर्मचाऱ्यांच्या शासनास आवश्यक त्या शिफारशी करणे.

२) समितीने शिफारस करतांना सदर शिफारशी ह्या सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांशी सुसंगत राहतील, याची दक्षता घ्यावी.

३. समितीने आपला अहवाल २ महिन्यात शासनास सादर करावा.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१११११५८४६७१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANGESH RAMDAS BAGDE

Digitally signed by MANGESH RAMDAS BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=10a4eba53d6cf4eecf749d5d71a069a321cba021994969cce3b86ba15bfeb4a3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2E7C3977D5A2A1A7E29FF2889A72947DE46CD8FFC991D80ABDDD9FF5803E9298, cn=MANGESH RAMDAS BAGDE
Date: 2023.05.11 11:59:29 +05'30'

**( मंगेश बागडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे.
२. अधीक्षक अभियंता तथा परिमंडळीय अधिकारी, दक्षता पथक, मुंबई परिमंडळ, ठाणे.
३. अधीक्षक अभियंता तथा संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे.
४. अधीक्षक अभियंता तथा परिमंडळीय अधिकारी, कोयना बांधकाम मंडळ, कोल्हापूर परिमंडळ, कोल्हापूर.
५. अधीक्षक अभियंता (दरवाजे) तथा परिमंडळीय अधिकारी, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक.
६. अधीक्षक अभियंता तथा परिमंडळीय अधिकारी, दक्षता पथक, छ.संभाजीनगर.
७. अधीक्षक अभियंता तथा परिमंडळीय अधिकारी, दक्षता पथक, अमरावती.
८. अधीक्षक अभियंता तथा परिमंडळीय अधिकारी, दक्षता पथक, नागपूर.
९. सह सचिव (आस्था) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (आ-तांत्रिक), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. आस्था (अतांत्रिक) संग्रहार्थ.